## हा... हा...हा... हास्यनेटाक्षरी

...आता हसा कवितेतून...

खास, रसिकांच्या आग्रहास्तव हा
विनोदी कवितांचा हास्यधमाका

**गंभीर आणि धकाधकीच्या आयुष्यात**
**थोडंसं हसायला काहीच हरकत नाही**
**मात्र हसताना पोट धरायला विसरू नका !!!**



हा अंक नियमीत मिळण्यासाठी तुमचा ईमेल पत्ता आम्हाला कळवा

netaksharee@gmail.com

अंक आवडला तर मित्रांना फ़ॉरवर्ड करा

**संपादक मंडळ**

यजमान संपादक –
**रेणूका रेपाळ ( अमेरिका )**

सहसंपादक –
**सोनाली घाटपांडे ( पुणे )**
**स्वप्ना कोल्हे ( नाशिक )**
**सुरुची नाईक ( नागपूर )**
**नाम गुम जायेगा ( ठाणे )**
**आनंद माने ( सोलापूर )**

अतिथी संपादक –
**वसंत आजोबा**

© या अंकाचे सर्वहक्क कविंच्या स्वाधीन

### या अंकात काय वाचाल ?

- या आठवड्यातील सुपरहिट कविता **“मिस्टर ऍण्ड मिसेस बबन ”**
- प्रेमाचा बर्म्युडा ट्रॅंगल **“स्वगत”** मध्ये
- परीक्षण एका **“पार्ट-टाईम प्रेयसीचं”**



# हनुमान



आक्रीत विक्रीत वगैरे
काय काय घडायला लागलय
पोरगं येता जाता
चक्क पाया पडायला लागलय

का ? तर म्हणे डॅडी सध्या मी
सुपरमॅन नाही हनुमान आहे...
मी म्हटलं हो का ? छान आहे !!

बायको म्हणाली
सोन्यासारखं पोर माझं
करतंय संस्कृतीचं रक्षण
चेष्टा सुचतीय तुम्हाला
जळलं मेलं लक्षण

अंजनीच्या पाठींब्याने
पवनपुत्र हसू लागला
घरातला झिरोचा बल्बही त्याला
सुर्याचा गोळा दिसु लागला

रोज नवे पराक्रम
रोज नवे उड्डाण
बिल्डींग हवालदिल
सोसायटी हैराण

संध्याकाळी घरी येताना
रोज चिंता लागलेली
कोण जाने आज
कोणत्या लंकेला आग लागलेली

शेवटी शेपुट सरसावून म्हणालो
प्रिये हे अवघड होतय विलक्षण
हे केवळ टीव्हीचं खुळ आहे
नाही संस्कृतीचं रक्षण

म्हणाली उतरतय जरासं खूळ
तो आता जरा अॅट ईझ होतोय
पण मला बाई वेगळीच चिंता लागलेली
उद्या "लॉर्ड कृष्णा" रिलीज होतोय....!!

\- **अनामिक**



## विनोदी चारोळ्या

सहजच तिने दोन्ही पापण्या मिटल्या
म्हणून त्याने तिला 'त्याची' जाणली
लाडात येऊन त्याने एक पापणी मिटली
आणि तिने 'त्याच्या' श्रीमुखात हाणली

पहिल्या भेटीतच तिने
माझा हात हातात धरलेला
दुस-या भेटीत कळलं
तिचा हात खिशात शिरलेला

**-सनिल**

## कालच कळलं पैलवान आहे तुझा भाऊ

कालच कळलं पैलवान आहे तुझा भाऊ
आपण ना प्रिये आता थोडं दूर-दूरच राहू

चंद्राचीही मला हल्ली वाटतेय भिती
तु ना! जपायला हवी घरची नाती
अगं वेडे अरेंज मॅरेजच असतं जास्त टिकाऊ
आपण ना प्रिये आता थोडं दूर-दूरच राहू
कालच कळलं.... पैलवान आहे तुझा भाऊ

ते हात हातातले अन सा-या आनाभाका
शप्पथ शप्पथ सांगतो सगळ्या होत्या थापा
पैसे जमलेच की गाव सोडून जाईन तु नको भिऊ
आपण ना प्रिये आता थोडं दूर-दूरच राहू
कालच कळलं.... **पैलवान** आहे तुझा भाऊ

- **प्रथमेश**
( **prathmeshwankhade@gmail.com** )





## प्रेम किती महाग झालंय,नाही !!

हल्ली संध्याकाळी केवळ
गजरा आणून चालत नाही
"डी-बियर्स" च्या डायमंडशिवाय
गालावर कळी खुलतच नाही

चौपाटीवर फ़िरून केवळ
तिचे मन आता रमत नाही
"बरिस्ता" त पैसे मोजल्याशिवाय
प्रेमाची नजर मिळतच नाही

रातराणीचा मंद दरवळ
आता तिला जवळ ओढत नाही
"चार्ली, ब्रुनो" फ़वारल्याशिवाय
रुसलेली कळी फ़ुलतच नाही

खरंच, प्रेम किती महाग झालय नाही !

- दीप ( **deepisthebest@gmail.com** )

# आमचे हे रात्री अस्स्स्से घोरतात..






चोरी,दरोडे पडतात शेजारच्या घरी
आमच्या घरापासून चोर लांबच राहतात
अहो,पहारेकरी नाही काही दारी
आमचे हेच चोरांना पळवून लावतात

हत्यारांविना ते अशी करामत करतात
काहीच न करता,घरा उपयोगी पडतात

सांगतांना बाईई लाज वाटते पण
आमचे हे रात्री अस्स्स्से घोरतात

अस्स्स्से घोरतात हो अस्स्स्से घोरतात

जसे तोफांतून दारुगोळे सुसाट सुटतात
की चोर जीव घेऊन पळतच सुटतात
पळतच सुटतात हो धुम्म पळत सुटतात
आमचे हे रात्री अस्स्स्से घोरतात

रातराणी फुलते मागच्या अंगणी
चंद्र चांदण्यांचे झिम्मा फुगडी गुंजतात
अहो,छळायला नसतं कुणी एकांती
आमचे हेच युध्दाची तुतारी फुंकतात

चढत्या रातींची नशा उतरवतात
काहीच न करता,मला उपयोगी नसतात

सांगतांना बाईई लाज वाटते पण
आमचे हे रात्री अस्स्स्से घोरतात

अस्स्स्से घोरतात हो अस्स्स्से घोरतात

वैदूचे अंगारे,डॉक्टरचे फवारे सारेच फसतात
सारेच फसतात हो सारे उपायच फसतात

आमचे हे रात्री अस्स्स्से घोरतात
घोरतच राहतात हो घोरतच राहतात

घर्र घ्वर्र र्र्र्र्र र्र घुर्र घुर्र्र्र्र्र्र घुर्र र्र्र्र्र

- **स्वप्ना कोल्हे ( नाशिक )**
( only.swapna@gmail.com )

# मिस्टर अँड मिसेस बबन

मिस्टर अँड मिसेस बबन
हे एक जोडपं भन्नाट होतं
तिचं वजन सत्तरच्या वर
तर त्याचं फक्त पन्नास होतं !

ती होती मस्त गुळाची ढेप
बबन नुसताच काटकुळा ऊस
मिस्कीलपणे त्यांच्या जोडीला
लोकं म्हणती "उंदीर आणि घूस"

एकदा तिने बबनला विचारलं,
"माझी वाटते का रे तुला लाज ?"
हसून बबन म्हणाला तिला,
"परत बोलू नको,बोललीस जे आज"..

बारीक वा जाडी..तू माझी आहेस
तुझ्याशीच गुंफला प्रेमाचा धागा आहे
कितीही आकार वाढला तुझा तरीही
ह्रदयात मावशील एवढी जागा आहे

उत्तर ऐकून ती फार सुखावली
आनंदाने तिची हास्यलाली फुलली
तुम्हाला वरलं हे माझं सौभाग्यच आहे
पुन्हा पुन्हा ती हे प्रेमाने बोलली

मित्रांनो,तुमच्यातही एक बबन आहे
कदाचित झोपला असेल,त्याला जागवा
आणि बायको कित्तीही वाढली तरीही
बबनप्रमाणेच तिला प्रेमाने वागवा

बबनप्रमाणेच तिला प्रेमाने वागवा..

**- चंद्रजीत अशोक कांचन ( बंगलोर )**
**(chandrajeet.ashok@wipro.com )**






- अतुल मुळे ( atul_mulay@hotmail.com )





## विनोदी चारोळ्या

खुप काही सोसावं लागतं
रेड्याची धडक खाऊन मरताना
म्हणून रेड्याला दगड मारू नये
'तो माळरानामध्ये चरताना'
**-चंद्रजीत**

खुप काही सोसावं लागतं
परीक्षेची तयारी करताना
टेकडीच्या गणपतीसाठी
"रोज-रोज पाय-या चढताना"
**- तुषार जोशी, नागपूर**

## स्वगत

त्याला ती आवडते
तिला ही तो आवडतो
मग मला ती आवडून
काय फ़ायदा ?
आणि
तिला दोघेही आवडतो
याला काय अर्थ आहे ??
मी काय बोलतोय
त्याला तरी कुठे अर्थ आहे ???
असला तरी काय फ़ायदा ?
नसला तरी काय बिघडलं
बिघडलं तरी माझं काय बिघडलं ??
मग
माझं नाहीतर कुणाचं बिघडलं ?
पण मी विचार का करतोय ??
मग मी नाही करणार तर
तिचा विचार कोण करणार ???
तो ?
तो आहेच की !!
पण तो म्हणजे मी तर नव्हे ?
नाही ! तो मी नव्हेच !
मग ? मी कोण आहे ?
मला मी कोण आहे हेच माहीत नसेल
तर काय फ़ायदा ??
हे काय सारखं फ़ायदा फ़ायदा करतोय ???
फ़ायदा नसला तरी काही गोष्टी केल्या जातातच
ना ?
प्रेम हे असंच नाही का ?
प्रेमाचा विषय मधेच कसा निघाला ?
मग विषय काय आहे ?
आणि ही बडबड कसली ?

याला आपण रिकाम्या मनाची असंबद्ध पण मुक्त
भरारी म्हणू
आणि आवरतं घेऊ !!!

- **अभिजीत दाते**
( abhijeet.date@gmail.com )

# अतिथी संपादक - वसंत आजोबा

कवी वसंत ढोबळे म्हटलं तर किती लोक ओळखतील शंकाच आहे. त्यांना सर्वजण आजोबा म्हणतात. वसंतअजोबा. अख्ख्या ओर्कुटचे आजोबा. ओर्कुटबाहेरही. वयाने आजोबा. पण फ़क्त वयानेच. कारण माणुसच तसा जिंदादिल. चळवळ्या, अगदी ट्रेन किंवा बसने प्रवास करतानाही पन्नासेक मित्र जमवतो. ड्रायव्हर, कन्डक्टर ते लहान मुलं, म्हातारे-कोतारे, कोणाशीही त्यांची लिंक जमते आणि कोणताही विषय त्यांना लोकांच्या मनात घुसायला पुरतो. आणि टायर्ड होउन रिटायर व्हायच्या या वयात ते नवनविन गोष्टींची सुरुवात करतात. नवीन नातीगोती जमवतात.

आजोबा व्यवसायाने चित्रकार. मुळचे जरी नागपुरचे असले तरी फ़ाळणीच्या वेळी पाकिस्तानातुन निघावं लागलेल्यांपैकी. पण कटुता नाही . त्यांच्या स्वभावातच कटुता नाही . दोन दिले, दोन घेतले ही वृत्ती. मागे हिशोब ठेवायचा नाही. सर जे जे स्कुल ऑफ़ ॲप्लाईड आर्ट मध्ये चित्रकला शिकवीली . अनेक मोठे चित्रकार घडवले. आंतरराष्ट्रीय लेव्हलवरचे अनेक चित्रकार त्यांचे मित्र आहेत. तसेही जे जे शिकता येईल ते शिकतात आणि जे जे देता येईल ते देतात त्यामुळे त्यांनी जे जे तच बस्तान मांडलं . पण सोबत ज्वेलरी डिझायनिंग पासुन ते पासष्टावी कला (जाहीरात) या सर्वांत सर्वोच्च स्थान मिळवीलं .प्रोमार्टस ॲडव्हर्टायझिंग या जाहीरात संस्थेचे ते मालक. ज्वेलरी एक्सपोर्टचा व्यवसाय केला. खुप पैसा मिळवला आणि सत्कारणी उधळला. कारण पैसा साठवण्यावर त्यांचा विश्वास नाही. आता त्यांनी कलाकृती केंद्र (**k3 Jwellaries**) नावाची गोरगरीबांना स्वयंव्यवसाय देणारी ज्वेलरी एक्सपोर्ट ची सेवाभावी संस्था सुरु केलीय त्या संस्थेच्या शाखा लंडन , हॉंगकॉंग येथेही आहेत. आताशी सेकंड इनींग सुरु झालीये. नवे ग्लोव्हस, नवं पॅड लावुन मैदानात उतरलेत . नवे उद्योग सुरु करताहेत. नव्या कला शिकताहेत कॉम्पुटर्सच्या भाषा, डीजीटल आर्ट, जावा, साहीत्य....जे जे काही करता येईल ते नव्याने सुरु करताहेत. अगदी लहान मुलाच्या उत्कंठेने, उत्साहाने, कुतुहलाने आणि हो, नम्रतेने. नव्या कलाकारांसमोर ते आपला रोब गाजवत नाहीत तर त्यांच्या नव्या फ़िल्डमधल्या ज्ञानापुढे अत्यंत नम्र होउन शिकायला बसतात. त्यामुळे उद्या ते माझ्यासमोर ओरीगामी कलाकार किंवा गिटारीस्ट म्हणुन आले तर मला अजिबात नवल वाटणार नाही.



खरं तर कविंची ओळख द्यायची फ़ारशी गरज नाही. त्यांच्या कविताच काय ते बोलतील पण इथे त्यांच्या कविता लिमिटेडच आहेत. अंकच छोटा आहे. तेव्हा त्यांच्या कम्युनीटीला भेट द्या. त्यांच्या कविता वाचा. त्यांची दुसरी कम्युनीटी (गेट टुगेदर) आहे तिला भेट द्या .त्यांची वेब पेजेस पहा. गुगलवर जाउन सर्च मारा.

**vasant_dhobley@yahoo.com**

पण या सर्वाहुन महत्वाचं त्यांना प्रत्यक्ष भेटा. आजचा हा अंक वाचल्यावर खरा फ़ायदा तुम्हाला त्यांना भेटुनच होइल. तुमच्या आयुष्याला कलाटणी मिळेल आणि आमच्या या नेटाक्षरी अंकाचं सार्थक होईल

**- नाम गुम जायेगा**

## ती कधीच दिसेना.....



मी फ़ायनल ईयर ला..
आणि ती फ़र्स्ट ईयर ला..

मी होतो बंदर
ती होती सुंदर

तिला रोज बघायचो..
मनातच कविता करायचो...
तिला नाही ऐकवायचो
स्वत:च रोज वाचायचो

झकपक पोषाखात
नटखट चाल
नटखट चालीला
पैंजणांचा ताल

झटपट चालीत
लटपट दिसेना
खटपट करुनही
गाली हसेना....
नंतर
ती कधीच दिसेना....

कारण

नटखट चाल
नटखट चालीला
पैंजणांचा ताल
सॅंडलला होती लोखंडी नाल
रस्त्यावर होते केळीचे साल
गाल गुलाबी झाले लाल
**- वसंताजोबा**



# पुस्तक परीक्षण

**कथा संग्रहाचे नाव – पार्टटाईम प्रेयसी**
**लेखक – चंद्रकांत र. महामिने**
**प्रथम आवृत्ती - २००६**
**मूल्य – २२० रु.**
**अजब पब्लिकेशन्स,कोल्हापूर**

पार्टटाईम प्रेयसी....
ताजी तरतरीत,मनमोहक,जिच्या सहवासात तुम्ही तुमचे तमाम ताण तणाव विसरुन रमाल,दिलखुलास हसाल. हवीहवीशी वाटेल,हो ना ?
हे काय ? अहो,मिश्किल हसत अशी भुवई का उंचावताय राव तुम्ही ?
आणि ताईसाहेब,तुमच्या रागाचा पारा का चढतोय ?
मंडळी,तुमचा काहीतरी गैरसमज झालाय."पार्टटाईम प्रेयसी"ह्या विनोदी कथासंग्रहाविषयी सांगत होते मी मघापासून.
तर,सुप्रसिध्द लेखक चंद्रकांत र.महामिने ह्यांचा हा १५ वा विनोदी कथा संग्रह.ह्यात आहेत हास्याचे १४ धबधबे. ज्यांचे दूर दर्शन म्हणजे संक्षिप्त ओळख इथे मी तुम्हाला करुन देतेय जेणेकरुन तुम्हीही ह्या पार्टटाईम प्रेयसीला फुल्लटाईम सहचरी कराल.

कथा १. पार्टटाईम प्रेयसी –
जावई सरकारी नोकरच पाहिजे असा हट्ट धरलेल्या एका सरकारी अधिकाऱ्याची लेक मात्र बाप बागाईतदार असलेल्या मुलाच्या प्रेमात पडते.आणि ह्या सासराहट्टाला पूर्ण करण्याच्या खटाटोपात एका सालस बँक कर्मचाऱ्याच्या नोकरीवर गदा येते.तो स्वर्गवासी होतो आणि ती नोकरी परत मिळवण्यासाठीची त्या भूताची खटपट म्हणजे ही कथा.

कथा २.खडूसवाडीचा वारकरी –
म्यां काय इचारते ,तुमास्नी येस.टी चा परवास सवलतीत करायचा हाये का ?अव्हं मग तुम्ही ह्या खडूसवाडीच्या वारकऱ्याला भेटूनच घ्या जी.

कथा ३.मल्लिका-ए-भंगारीस्तान –
भंगारीस्तान के शहजादे के पास है,बॅचलर ऑफ भंगारोलॉजी का सर्टिफिकेट.क्या उसकी दिल की मल्लिका उसके भंगारीस्तान की मल्लिका बनने के लिये राजी होगी या उसकू जेल भिजवायेगी ? ये पता करने के लिये सबकू गुलशनपूर के भंगारीस्तान में आनाही पडेगा ( घरमें कुछ भंगार पडा हो तो वो भी साथ लेके आना,अच्छा भाव मिलता इधर )

कथा ४.भटाला दिली वासरी –

नवरी ऐवजी करवलीच्या तोंडात बर्फी कोंबणाऱ्या आणि नवरीसाठी असलेला शालू स्वतः नेसून भावी सासऱ्याच्या कमरेभवती हात टाकून रिमिक्स गाण्यावर नाचणाऱ्या नवरदेवाचे लग्न कथा नायिकेशी होते का? ह्या लग्नाचे आपल्यास सहपरिवार अगत्याचे आमंत्रण.



कथा ५.मिरगीचा झटका –
कोण म्हणतं ? धसकटवाडी पोलिस ठाण्याच्या हद्दीत गावठी दारु मिळते ?
असं म्हणणाऱ्याला इन्स्पेक्टर नवसागरे तुरुंगातच टाकील..भट्टीवाल्याला नंतर.
शक्ती कपूर,अनुपम नंतर आता नवसागरेलाच बसला स्टिंग ऑपरेशनचा डंख.

कथा ६.लफड्यातून लफड्याकडे –
अपघातात हृदय निकामी झालेल्या भावी जावयाला कृत्रिम हृदयरोपण तंत्राने दिले जाते एका नुकत्याच मृत तमासगीर महिलेचे हृदय अन जावई सासऱ्याच्या मागे लागून हॉस्पिटलमध्ये भलताच तमाशा सुरु होतो.वाचा हे लफडं.

कथा ७.बापाचा माल –
इयत्ता ४ थीतला विद्यार्थी जेवणाच्या डब्यातून बापाचा माल वाटत सुटतो.आणि लग्नाचे लाडू खायचा योग येतो तो मात्र मुख्याध्यापकांना.तिथल्या २ शिक्षकांनी मुलांना शिकवण्याऐवजी कुठला धडा स्वतःच शिकलाय ? तुम्हीही खा I mean वाचा बापाचा माल.

कथा ८.छबी –
राजकारण्यांची छबी पत्रकारांच्या मदतीने सुधरु शकते अन बिघडूही शकते..म्हणजे,बिघडलेली छबी उघडही होऊ शकते.कशी ते वाचा..वर्तमानपत्रात नाही हो..ह्या कथेत.

कथा ९.जित्याची खोड -
जर तुमची मोलकरीण धुणं वाळत घालायच्या दोरीवर टुण्णकन उडी मारुन दोरीवर कसरत करत कपडे वाळत टाकायला लागली तर ? तर काय ? ते दृश्य पाहून तुम्ही बेशुध्द पडाल.जित्याची खोड मेल्याशिवाय जात नाही हेच खरं.

कथा १०.काव्य भेंडोळे प्रकल्प –
हा चित्रमय काव्य प्रकल्प करता करता कवयित्रीची जोडी कवीबरोबर जमते की चित्रकारा बरोबर ?
अहं,मी नाही सांगणार.

कथा ११.नानाचा "मामा" –
साहित्यिक नायकाला हरभऱ्याच्या झाडावर चढवून त्याच्याच घरी मुक्काम ठोकून फुक्कट पाहुणचार सहपरिवार उपभोगणाऱ्या भामट्यांना देण्यासाठीचे अपशब्द तुम्ही नायकाकडूनच घ्या.

कथा १२.आदर्श “देशी” भक्त –
खुळवाडीत दारुबंदी लागू होते पण तिथल्या “देशी” भक्तांमुळे शेरे पंजाब ढाब्यात लोकांची सांजेची सोय होते.बघा तर न्हावी आणि परीटाच्या जोडीची करामत.

कथा १३.खुळवड खुर्दची टी.व्ही.स्टार –
एकदा का कुणी टीव्ही वर झळकलं की त्याला आयुष्यभर ह्या टीव्ही व्यसनाने पछाडलाच समजा.मग,कोंबडीची पिसं पिसं झालीत तरी हरकत नाही.विचारा,बायजा बाईला.

कथा १४.महिला सौंदर्य विकास महामंडळ –
महिला सौंदर्य विकास महामंडळाचं अध्यक्षपद त्या महिलेसच दिले जाईल जी सर्वाधिक कुरुप आहे.चला मैत्रिणींनो,कोण आहे बरं असं इथे ? या पुढे.

तर,अशा आहेत ह्या खळखळून हसवणाऱ्या १४ लघुकथा.या कथासंग्रहाचे वैशिष्ट्य म्हणजे,प्रत्येक कथेतील विषयानुरुप पात्रांची निवडलेली नावं.त्यांच्या व्यवसायानुसार त्यांचे खुसखुशीत संवाद.
ह्यातील कथांचा प्रवाहीपणा वाचकास जखडून ठेवतो.एकदा ह्यातली कुठलीही कथा वाचायला घेतल्यावर ती पूर्ण वाचल्याशिवाय वाचकाचे समाधानच होत नाही.टाळ्या घेणारी,वाचकांची मनमुराद दाद घेऊन जाणारी वाक्यं ह्याच्यात ठायीठायी सुलभतेने येतात.
आणि हेच तर विनोदी कथा संग्रहाचं यश..वाचकाचे दिलखुलास हास्य.

लेखक परिचय –
सुप्रसिध्द लेखक चंद्रकांत र.महामिने ह्यांचे १५ कथासंग्रह,९ कादंबरी,५ एकांकिका,९ बालसाहित्य,२ बालनाटिका,१ प्रौढ साक्षर साहित्य,४ व्यंगकविता असे साहित्य प्रकाशित झालेले आहे.आकाशवाणीवर त्यांचे कार्यक्रम होत असतात.वृत्तपत्रातून विनोदी सदर लेखन,वात्रटिका प्रकाशित होत असतात.गेल्या ३० वर्षांपासून ते दिवाळी वार्षिक अंकांसाठी नियमित विनोदी लेखन करीत आहेत.
त्यांच्या ५ कथासंग्रहांना राज्य शासनाचा उत्कृष्ट वाङःमय पुरस्कार तसेच ४ विनोदी कथासंग्रहांना विविध पारितोषिकांनी सन्मानित केले गेलेले आहे.
तालुका पातळीवरील ३ साहित्य संमेलनांचे अध्यक्षपद व एका साहित्यिक मेळाव्याचे अध्यक्षपदही त्यांनी भुषविले आहे.

तर रसिकांनो,जरुर वाचा..विनोदी कथासंग्रह “पार्टटाईम प्रेयसी”.

- **स्वप्ना कोल्हे**

नेटाक्षरी हा अंक विनामूल्य वितरीत केला जातो आपल्या सुचना ,टीका आणि सहकार्य यांचे स्वागत आहे .
netaksharee@gmail.com